नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी-२९२०/प्र.क्र.६०/ना.पु.१५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ सप्टेंबर, २०२०.

वाचा :-

१) विभागाचा शा.नि.क्र.संकीर्ण-१००३/प्र.क्र.४८३/ना.पु.१४, दिनांक २६.०६.२००३,
२) विभागाचा शासन निर्णय क्र.अस्थायी-२९२०/प्र.क्र.६०/ना.पु.१५, दि.१६.०३.२०२०,
३) वित्त विभाग शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०.

**प्रस्तावना :**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील पदांचा आढावा घेवून संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. या आकृतीबंधानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप यंत्रणेसाठी एकूण १८९० पदे मंजूर करण्यात आली आहेत. या पदांमधील अंशकालीन सफाईगार संवर्गातील ५० व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४९ अशा एकूण ९९ अस्थायी पदांना संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत.

**शासन निर्णय :-**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई कार्यालयासाठी अंशकालीन सफाईगार संवर्गातील ५० व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४९ अशा एकूण ९९ पदांची आवश्यकता विचारात घेवून, सदर पदे **दि.०१.०९.२०२० ते विभागाचा नवीन आकृतीबंध मंजूर होईपर्यंत किंवा दि. २८.०२.२०२१ पर्यंत (यापैकी जे अगोदर होईल तो पर्यंत)** पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या ९९ अस्थायी पदांची संवर्गनिहाय पदसंख्या पुढील तक्त्यात दर्शविण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सफाई कामगार (अंशकालीन) | ५० |
| २ | मेहेतर(अंशकालीन) | ४९ |
| | **एकूण** | ९९ |

३. उपरोक्त अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०१, वेतन " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१७१२१५३००८०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Asmita Ravindra Patil

Digitally signed by Asmita Ravindra Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3aae158692ef65b4486d9f1ec9f35e5a368c85b29b6c959f9fc2c7c0e59d944c, serialNumber=8e2cf7f99a7e33f6152bff0b34255dd63550b37c8fbbb9a98cee4ecd4336f598, cn=Asmita Ravindra Patil
Date: 2020.09.17 12:16:48 +05'30'

**(अस्मिता पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई.

२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

३) महालेखापाल -१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

४) महालेखापाल -१, महाराष्ट्र (लेखा परीक्षा), मुंबई.

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) वित्त विभाग (व्यय -४), मंत्रालय, मुंबई - ३२.

८) वित्त विभाग (अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई ३२.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

१०) निवड नस्ती (ना.पु.१५).